वनविभागाचे संगणकीकरण या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता निधी वितरित करणेबाबत. (२४०६ ८६६९)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.१००/फ-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १८/०३/२०२५

वाचा :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.१००/फ-१०, दि.२७.०५.२०२४.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.१००/फ-१०, दि.२४.०७.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१ / पी / यो / चाबाप्र / प्र.क्र.३४ (८६६९) /६९०/२०२४-२५, दि.२१.१०.२०२४.
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.१००/फ-१०, दि.१९.११.२०२४ व दिनांक २३.०१.२०२५.
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/फ-१०, दि.१२.०२.२०२५.
८) उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१ / पी / यो / चाबाप्र / प्र.क्र.३४ (८६६९) /९५६/२०२४-२५, दि.१५.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ करिता वनविभागाचे संगणकीकरण-२४०६ ८६६९ या योजनेंतर्गत १०-कंत्राटी सेवा अंतर्गत - रु.१३९६.८० लक्ष, २८-व्यावसायिक सेवा अंतर्गत - रु.३४३.७५ लक्ष व ५० - इतर खर्च अंतर्गत - रु.३६८.४५ लक्ष असे एकूण रु.२१०९.०० लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित केला आहे.

वित्त विभागाने संदर्भीय क्र.४ येथील दिनांक १२.०२.२०२५ च्या परिपत्रकान्वये सन २०२४-२५ चे सुधारित अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही सुरू असून सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता, १०- कंत्राटी सेवा या उद्दिष्टासाठी ९० टक्के आणि २८-व्यावसायिक सेवा या उद्दिष्टासाठी ८० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात येत असल्याचे, नमूद केले आहे.

उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय क्र. ८ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध निधीच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उप वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.८ अन्वये सादर केलेला प्रस्ताव, वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१, ५ व ८ येथील परिपत्रक व बीम्स प्रणालीवरील निधी उपलब्धता विचारात घेता, वनविभागाचे संगणकीकरण करणे या योजनेंतर्गत खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार निधी खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(आकडे रु. लाखात)

| लेखाशिर्ष | उद्दिष्ट | खर्च करण्यास मान्यता द्यावयाचा निधी |
|---|---|---|
| मागणी क्रमांक :- सी-७,<br>२४०६, वनीकरण व वन्यजीवन,<br>१०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती,<br>राज्य योजनांतर्गत योजना,<br>(१७) वन विभागाचे संगणकीकरण,<br>(१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण,<br>संकेतांक-२४०६ ८६६९ | १० - कंत्राटी सेवा | १५१.६८ |
| | २८- व्यवसायिक सेवा | १६९.९५ |
| **एकूण** | | ३२१.६३ |

२. उपरोक्त निधी खर्च करताना पुढील अटींची पूर्तता होईल, याची खात्री करण्यात यावी:-

i) प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी मंजूर कामांसाठीच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही याची खात्री करावी. तसेच मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर / नवीन क्षेत्रावर / नवीन कामांवर खर्च करता येणार नाही.

ii) सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणाऱ्या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

iii) सदर योजनेकरीता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

iv) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४, दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रकात्रातील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री करावी. तसेच त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

v) वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनांकरीता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तीची पूर्तता करावी.

vi) वितरीत करून घेतलेला निधी मंडळे / महामंडळे यांच्या वा इतर बँक खात्यात, स्वयप्रपंची लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार नाही.

३. उपरोक्त खर्च मागणी क्र. सी-७ २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७)(०१) वन विभागाचे संगणकीकरण, (२४०६ ८६६९), या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१८१२११५८७११९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

GANESH
TUKARAM
JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2025.03.18 12:14:56 +05'30'

**( गणेश जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), ½, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
६) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-६) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
८) कार्यासन (ब-१ / फ-२), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती.